**प्रशासकीय मान्यता-**
रत्नागिरी जिल्हा न्यायालयाच्या आवारात
विस्तारीत न्यायालय इमारत बांधण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन,**
विधी व न्याय विभाग,
शासन निर्णय क्र.सीसीबी-२९१०/८/प्र.क्र.१४/का-१३
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,दिनांक:- १० फेब्रुवारी,२०११.

**पहा :-** १) प्रबंधक (निरीक्षणे-२), उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई यांचे पत्र क्र.बी(डब्ल्यु) ६०८१/२००९,दिनांक-२२ डिसेंबर,२००९.
२) प्रमुख जिल्हा न्यायाधिश, रत्नागिरी यांचे पत्र क्र.डी-१/४३२४/२००९,दि.१६.१०.२००९.

**शासन निर्णय**:- रत्नागिरी जिल्हा न्यायालयाच्या आवारात विस्तारीत न्यायालय इमारत बांधण्याच्या रु.७,३९,५९,०६६/-(रुपये सात कोटी, एकोणचाळीस लक्ष,एकोणसाठ हजार सहासष्ट फक्त) इतक्या अंदाजित खर्चाच्या कामास (खाली नमुद केलेल्या विगतवारीनुसार) या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

रुपये

| अनुक्रमांक | तपशिल | रक्कम |
|---|---|---|
| १ | इमारतीचा बांधकाम खर्च | ५,८७,८७,८५९ |
| २ | आकस्मिकत खर्च (४ %) | २३,५१,५१४ |
| ३ | विद्युतीकरण ( ११%) | ६४,६६,६६४ |
| ४ | बाहय पाणी पुरवठा व मलनिस्सारण (८%) | ४७,०३,०२९ |
| ५ | भूविकास | १०,००,००० |
| ६ | व्हेइकल स्टॅण्ड,पार्किंग शेड | ५,००,००० |
| ७ | बागबगीचा व लॅंड स्केपिंग | १,५०,००० |
| | एकूण | **७,३९,५९,०६६** |

२. ही प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

(अ) " काम सुरु करण्यापूर्वी जमिनीच्या मालकी हक्काबाबत खातरजमा करण्यात यावी."

(ब) " मांडणी नकाशा व विस्तृत नकाशा मुख्य वास्तुशास्त्रज्ञ यांच्याकडून मंजूर करुन घेऊनच काम सुरु करावे."

(क) "अंतर्गत रस्ते,संरक्षण भिंत, इत्यादि बाबतची मापे छेद नकाशासह विस्तृत अंदाजपत्रकात समाविष्ट करुनच काम सुरु करावे."

३. या प्रीत्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र.एच-८, ४०५९-सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च,०१-कार्यालयीन इमारती,०५१- बांधकामे-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-प्रमुख बांधकामे-०३ न्यायदान" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. मात्र, **अर्थसंकल्पात तरतूद केल्याशिवाय कामास सुरुवात करण्यात येऊ नये.**

४. हे आदेश सार्वजनिक बांधकाम विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक:-२२८/इमा-२, दि.५.८.२०१० व नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.३२५/१४४३,दि.८.११.२०१० अनुसार त्या

विभागाच्या सहमतीने आणि वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.७०६/१०/व्यय-६,दि.२०.११.२०१० अन्वये त्या विभागाच्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( र. ग. पांचाळ )
कार्यासन अधिकारी.

प्रति,

महाप्रबंधक, उच्च न्यायालय , मुंबई,
प्रबंधक (निरीक्षण), उच्च न्यायालय (अपिल शाखा),मुंबई,
प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश,रत्नागिरी ,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखापरीक्षा) - एक, महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखापरीक्षा) - दोन, महाराष्ट्र,नागपूर,
अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ,रत्नागिरी,
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम ( उत्तर )विभाग,रत्नागिरी,
(मूळ अंदाजपत्रक व आराखडे यांच्यासह)
उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग,क्र.१,रत्नागिरी,
जिल्हा कोषागार अधिकारी,रत्नागिरी,
सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
वित्त विभाग/व्यय-६,मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
नियोजन विभाग,१४४३, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
अपर आयुक्त व सदस्य सचिव,उर्वरित महाराष्ट्र वैधानिक विकास मंडळ, १८ वा
मजला, नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालयासमोर, मुंबई- ४०० ०३२,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय,मंत्रालय,मुंबई.
कक्ष अधिकारी, का. ७, ११ व १२,विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
निवड नस्ती.